वितरण आदेश क्र.२

सन २०१८-१९ जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-
प्रशासन मधील अधिकारी व कर्मचारी यांचे
वेतन व भत्ते भागविण्याकरीता अनुदान
वितरीत करण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन
## ग्रामविकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः जिग्राप्र-१११८/प्र.क्र-१२२/योजना-५

बांधकाम भवन इमारत,तळमजला
२५,मर्झबान पथ, फोर्ट,मुंबई-४०० ००१.
तारीख: ०८जानेवारी,२०१९

वाचा -

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल, २०१८
२) केंद्र शासनाचे आदेश क्र.१७०१४/०१/२०१८-१९-DRDA(part-१)(Sl.No.१४), दिनांक १४ सप्टेंबर, २०१८
३) केंद्र शासनाचे आदेश क्र.१७०१४/०१/२०१८-१९-DRDA(part-१)(Sl.No.१४), दिनांक २८ सप्टेंबर, २०१८
४) ग्राम विकास विभाग , शा.नि.क्र. जिग्राप्र-१११८/प्र.क्र.१११/योजना-५, दिनांक ०४ आॅक्टोबर, २०१८
५) केंद्र शासनाचे आदेश क्र.१७०१४/१४/२०१८-१९-DRDA(Sl.No.६०), दिनांक २० डिसेंबर, २०१८

प्रस्तावना -

जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन ६०:४० अशी केंद्र पुरस्कृत योजना असून, या योजनेंतर्गत केंद्र शासनाचा ६०% हिश्याचा निधी थेट जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी प्राप्त होणारा हिस्सा राज्याच्या अर्थ संकल्पात दर्शवून त्याचे वितरण सर्व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना करण्याचे केंद्र शासनाचे निदेश आहेत. **राज्य समरुप हिस्सा ४०% नियोजन विभागामार्फत जिल्हा नियोजन विकास समिती मार्फत जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकडे वितरीत करण्यात येते.**

जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन मधील अधिकारी व कर्मचारी यांच्या वेतन व भत्त्यासाठी केंद्र शासनाच्या हिश्श्याची तरतूद राज्याच्या अर्थसंकल्पात ग्राम विकास विभाग मागणी

**क्र.एल-३, २५०१-ग्रामीण विकासासाठी विशेष कार्यक्रम, ०१-एकात्मिकृत ग्राम विकास कार्यक्रम, ००१-संचालन व प्रशासन, (००) गट पातळीवरील यंत्रणा अधिक बळकट करणे, (००)(०३)जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन (योजनांतर्गत), (६०% केंद्र पुरस्कृत योजना), ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (केंद्र हिस्सा), (२५०१ २९१७)** या लेखाशिर्षाखाली २०१८-२०१९ आर्थिक वर्षासाठी जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन मधील अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन व भत्ते भागविण्याकरीता रुपये ३९१८ लक्ष एवढा निधी अर्थसंकल्पित केला आहे.

यापैकी जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन मधील अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन व भत्ते अदा करण्याकरीता केंद्रीय ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार यांचे दिनांक १४ सप्टेंबर, २०१८ व दिनांक २८ सप्टेंबर, २०१८ च्या पत्रान्वये जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन योजनेंतर्गत अनुदानाचा **पहिला हप्ता** म्हणून केंद्र हिस्सा रु.४,८०,९२,०००/- व रु.१,२९,०५,०००/- एकूण रु.६,०९,९७,०००/- (रुपये सहा कोटी नऊ लाख सत्याण्णव हजार) इतका अनुदान प्राप्त झाला होता, सदर निधी संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी ,जिल्हा परिषद यांना आहरण व वितरण अधिकारी म्हणून दिनांक ०४ ऑक्टोबर, २०१८च्या शासन निर्णयान्वये अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर (बी.डी.एस.) वर उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे.

## शासन निर्णय-

जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन मधील अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन व भत्ते अदा करण्याकरीता केंद्रीय ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार यांचे दिनांक २० डिसेंबर, २०१८ च्या पत्रान्वये जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन योजनेंतर्गत अनुदानाचा **दुसरा हप्ता** म्हणून केंद्र हिस्सा रु.६,०९,९७,०००/- (रुपये सहा कोटी नऊ लाख सत्याण्णव हजार) इतका अनुदान प्राप्त झाला आहे. सदर निधी रु.६,०९,९७,०००/- (रुपये सहा कोटी नऊ लाख सत्याण्णव हजार) सन २०१८-२०१९ या आर्थिक वर्षासाठी जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन मधील अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन व भत्ते भागविण्याकरीता संबंधीत जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्याकडे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून सुपूर्द करण्यात येत आहेत.

२) सदर खर्च ग्राम विकास विभाग मागणी क्र.एल-३, २५०१- ग्रामीण विकासासाठी विशेष कार्यक्रम, ०१-एकात्मीकृत ग्राम विकास कार्यक्रम, ००१-संचालन व प्रशासन, (००) गट पातळी-वरील यंत्रणा अधिक बळकट करणे, (००)(०३) जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन (योजनांतर्गत), (६०% केंद्र पुरस्कृत योजना), ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (केंद्र हिस्सा), (२५०१ २९१७) या लेखाशिर्षाखाली सन २०१८-२०१९ च्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३) हे अनुदान ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे, अन्यथा ती वित्तीय अनियमितता समजण्यात येईल, याची अंमलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी. तसेच सदर निधी खर्च न झाल्यास संबंधित अधिकाऱ्यास जबाबदार धरण्यात येईल, याची कृपया नोंद घ्यावी.

४) या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान सर्व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन मधील अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन व भत्ते भागविण्याकरीता संबंधीत जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीव्दारे (B.D.S.) वितरीत करण्यात येत आहे.

५) सदरहु अनुदान कोषागारातून काढल्यानंतर प्रकल्प संचालकांनी पुढील माहिती :- १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक त्वरित लेखाधिकारी, कार्यासन क्र.योजना-२, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, २५-मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-४०० ००१ यांच्याकडे पाठवावी.

६) जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा-प्रशासन मधील अधिकारी व कर्मचारी यांच्या रिक्त पदांची माहिती शासनाच्या www.rural.nic.in या संकेतस्थळावर दरमहा अद्ययावत करुन दरमहा खर्चाच्या मासिक अहवालासोबत त्याची प्रत शासनास पाठविण्यात यावी.

७) सदर निधी खर्च झाल्याचा उपयोगिता प्रमाणपत्राची प्रत राज्य शासनास पाठविण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१०८१५०९५६१६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Madhao Kale

Digitally signed by Anil Madhao Kale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e29bfbc8f31dc2b43b5ba876864f627ec1dc888a2c6faead66c26cb1a5c2f137, cn=Anil Madhao Kale
Date: 2019.01.09 12:03:47 +05'30'

**अनिल काळे**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)
२. महालेखापाल(लेखापरिक्षा) व (लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१,मुंबई.
3. महालेखापाल(लेखापरिक्षा) व (लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२,नागपूर.
4. संचालक, लेखा व कोषागार, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
5. संचालक, निवासी व लेखा कोषागार, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

6. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,(सर्व).
7. उप आयुक्त, (विकास) विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)
8. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व).
9. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
10. मुख्य लेखापरिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
11. वित्त विभाग (व्यय-१५/अर्थ-१७), मंत्रालय, मुंबई.
12. वरिष्ठ लेखाधिकारी, शासनस्तर अंतर्गत लेखा परिक्षण पथक, बांधकाम भवन, मुंबई-०१.
13. निवडनस्ती (कार्यासन योजना-५).

**शासन निर्णय क्र.जिग्राप्र-२०१८/प्र.क्र-१२२/योजना-५,**
**दिनांक- ०८ जानेवारी, २०१९ सोबतचे विवरण पत्र.**

| अ.क्र. | जिल्हा | वेतन व भत्ते (दुसरा) (रुपये लाखात) |
|---|---|---|
| १. | अहमदनगर | १९.४६ |
| २. | अकोला | १७.०७ |
| ३. | अमरावती | १९.४६ |
| ४. | औरंगाबाद | १७.०७ |
| ५. | बीड | १९.४६ |
| ६. | भंडारा | १७.०७ |
| ७. | बुलढाणा | १९.४६ |
| ८. | चंद्रपूर | १९.४६ |
| ९. | धुळे | १३.७८ |
| १०. | गडचिरोली | १९.४६ |
| ११. | गोंदिया | १७.०७ |
| १२. | हिंगोली | १३.७८ |
| १३. | जळगांव | १९.४६ |
| १४. | जालना | १७.०७ |
| १५. | कोल्हापूर | १९.४६ |
| १६. | लातूर | १७.०७ |
| १७. | नागपूर | १९.४६ |
| १८. | नांदेड | २०.०७ |
| १९. | नंदूरबार | १७.०७ |
| २०. | नाशिक | १९.४६ |
| २१. | उस्मानाबाद | १७.०७ |
| २२. | परभणी | १७.०७ |
| २३. | पालघर | १७.०७ |
| २४. | पुणे | १९.४६ |
| २५. | रायगड | १९.४६ |
| २६. | रत्नागिरी | १७.०७ |
| २७. | सांगली | १७.०७ |
| २८. | सातारा | १९.४६ |
| २९. | सिंधुदुर्ग | १७.०७ |

| | | |
|---|---|---|
| ३०. | सोलापूर | १९.४६ |
| ३१. | ठाणे | १३.७८ |
| ३२. | वाशिम | १७.०७ |
| ३३. | वर्धा | १७.०७ |
| ३४. | यवतमाळ | २०.०७ |
| | **एकूण** | **६०९.९७** |

**(रुपये सहा कोटी, नऊ लक्ष, सत्याण्णव हजार फक्त)**

Anil Madhao Kale

Digitally signed by Anil Madhao Kale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e29bfbc8f31dc2b43b5ba876864f627ec1dc888a2c6faead66c26cb1a5c2f137, cn=Anil Madhao Kale
Date: 2019.01.09 12:04:30 +05'30'

(अनिल काळे)

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**